
रंगांची धम्माल !
बालनेटाक्षरी
Happy Holi
ई साहित्य प्रतिष्ठान
www.esahity.com
ई साहित्य प्रतिष्ठान
esahity@gmail.com

www.esahity.com

ई साहित्य प्रतिष्ठान

esahity@gmail.com

# बाल नेटाक्षरी


संपादिका : सौ अनघा हिरे (नाशिक)

मुखपृष्ठ : आदिती हिरे



प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान
www.esahity.com
9869674820



E mail : balnetakshari@gmail.com
**9422284116**




ई साहित्य प्रतिष्ठान

[नेटवरची धम्माल मस्ती](#)

[संपादकाच्या मनातले](#)

**कविता**

रंगांच्या राज्यात .. मोहना कारखानीस

असावा सुंदर चॉकलेटचा बंगला.. राजा मंगळवेढेकर

रंगांचा सोहळा -अरुण वि देशपांडे

पणजी आजीची गोधडी..तनया देवळे

**कथा**

फुलपाखरू.. राजीव तांबे

जादूचा फुगा ... रेशमी गुजराथी

रंग आणि माणसाची भूक

नेटवरची धम्माल मस्ती

बच्चे कंपनी

पंधरा वर्षांपुर्वी लोकांना इंटरनेट माहित नव्हतं. ATM नव्हतं. मोबाईल नव्हते. बहुतेक लोक कॉम्प्युटर शिवायच काम करायचे. अजून पंधरा वर्षांनंतर इंटरनेट शिवाय कसलंच काम होणार नाही अशी परिस्थिती असेल. आता तुम्ही जी मुलं आहात ती मोठी झाल्यावर तुमचं पान इंटरनेट शिवाय हलणार नाही बुवा. पण तरीही तुमचे आई बाबा तुम्ही इंटरनेट्ला हात लावला की तुम्हाला रागावतात का ? इंटरनेट वर जास्त बसू देत नाहीत का ?

कारण माहित आहे ? इंटरनेट जितकं चांगलं तितकंच वाईट. इंटरनेटवर फ़सवणूक पण खूप असते. काय बघावं काय बघू नये याचं मार्गदर्शन नसेल तर मुलं कुठल्या कुठे वाहत जाऊ शकतात. फ़सू शकतात. कॉम्प्युटर बिघडू शकतो. व्हायरस येतात.

त्यात इंटरनेटवर जिकडे जावं तिकडे इंग्रजीच इंग्रजी. मग आपण मराठी मुलांनी करायचं काय? आपल्याला आपलं मराठी इंतरनेट हवं की नको ? तेव्हा ई साहित्य प्रतिष्ठानने आणलंय मुलांसाठी खास मासिक. बालनेटाक्षरी. यात मराठी मुलांना लिहायला वाव आहे. आणि माहिती मिळायलाही. यातून आपण इंटरनेट

कसं वापरायचं. काय बघायचं, काय टाळायचं ते सगळं समजून घ्यायचं आहे. तुम्हाला आपल्या मित्रमंडळींना काही सांगायचं असलं, गोष्ट, कविता लिहायची असली किंवा आपण काढलेली चित्रं फ़ोटो दाखवायचे असले तर आमच्या कडे पाठवून द्या. पालकांना आणि दादा ताईंना सुद्धा विनंती. आपल्या कडच्या छोट्टु कंपनीने काही कौतुक करण्यासारखं केलं बनवलं लिहीलं तर आमच्याकडे पाठवा. आपण आज कौतुक केलं तरच ती मुलं उद्या काही पराक्रम करणार ना !

आमचा पत्ता :

balnetakshari@gmail.com

## संपादकाच्या मनातले .....

रंगुनी रंगांत सार्या. रंग माझा वेगळा

आपण म्हणतो ना त्याचा रंग जरा वेगळा आहे . म्हणजे इथे रंग हा अंगाच्या रंगाशी अभिप्रेत नाही इथे रंग म्हणजे त्या व्यक्तीचा स्वभाव , गुण छंद, आवडी निवडी हे सर्व आपण त्या व्यक्तीचा रंग म्हणतो .

त्या प्रत्येक रंगाच्या छटाही वेगवेगळ्या असणारच ना!

म्हणूनच

प्रत्येकाच्या कलागुणांना वाव मिळावा आणि प्रत्येकाच्या भावना व्यक्त व्हाव्या यासाठी मुलांसाठी हक्काचे व्यासपीठ तयार केलेले आहे ते म्हणजे आपले 'बाल नेटाक्षरी'

ई साहित्य प्रतिष्ठानच्या अनेक उपक्रमां पैकी लहानांसाठीचा 'बाल नेटाक्षरी' हा उपक्रम आहे.

मग बालदोस्तांनो!

रंग खेळणार आहात ना भरपूर.. भरपूर खेळा, मजा करा , नैसर्गिकच रंगच वापरा. जरा जपूनच खेळा ह ! चेष्टा मस्करीत कुणाला त्रास होणार नाही याची काळजी घ्या ..

होळीपाठोपाठ येते ती रंगपंचमी. या रंगपंचमीच्या निमित्ताने तुम्हीही रंगात न्हाऊन निघत असाल. मग अशा रंगलेल्या चेहऱ्यांचे फोटो...कधी तरी फोटो चाळता चाळता त्या धमाल आठवणी...तुमच्याबाबतही असं होतच असेल. 'बाल नेटाक्षरी' शी शेअर करा तुमच्या या आठवणी, तुमच्या रंगपंचमीच्या फोटोसह.आम्ही प्रसिद्ध करू 'बाल नेटाक्षरी' च्या पुढच्या अंकामध्ये.

पुढच्या महिन्याचा विषय आहे "गीत" तर मग विचार कसला करताय घ्या लेखणी हातात तुमच्या आणि तुमच्या मित्र मैत्रिणीचे तसेच ओळखीच्या कुणाचेही गाणे कविता आम्हाला पाठवा. कोणीही आणि कितीही गाणे पाठवू शकतात. मग काय ! होऊन जाऊ द्यायची का सुरांची मैफिल ?

'बाल नेटाक्षरीचे इतर अंक विनामूल्य डाउनलोड करण्यासाठी येथे क्लिक करा

http://balnetakshari.blogspot.in/

तुमचे लिखाण आम्हाला ह्या आयडी वर पाठवू शकतात. balnetakshari@gmail.com

ई साहित्य प्रतिष्ठानचे ईतर अंक विनामूल्य डाउनलोड करण्यासाठी येथे क्लिक करा www.esahity.com

अनघा हिरे

# रंगांच्या राज्यात

रंगांच्या राज्यात डोकावू या जरा

काय त्यांचे म्हणणे ऐकू या जरा

तो पहा तिकडे निळूल्या काय म्हणतो

गोबरे गाल फुगवून आकाशाला हात
लावतो

हिरू दादाची ची तर तऱ्हाच निराळी

झाडा फुलांना बघा गच्च कवटाळी

लालू बघा ना लालम लाल

खुलवून दाखवी गोरे गोरे गाल

हा तर बघा आपला रंग मोरपिशी

त्याच्यासाठी होई आमची ताई
वेडीपिशी

कोपर्यात बघा ना बसलाय
पिलू पिवळा

त्याच्या शिवाय जगाचा अर्थच निराला

गोड गोड गुलाबी हळूच हसून दाखवी

तुम्हालाही वेड लावेल आहे फारच
लाघवी

जांभळा कसा बरे राहील निराळा

चला घालू त्याच्या गळ्यात गळा

शुभ्र पांढरा त्याची अनोखीच तऱ्हा

सर्वांना शिकवी जगण्याची कला

भगवा, केशरी अजबच शेंदरी

मारुती रायाला आवडी भारी

असे आमचे सगळे रंगोबा खूप आगळे

त्यांच्याविना होईल जड आमचे जगणे

मोहना कारखानीस



# असावा सुंदर चॉकलेटचा बंगला.

## राजा मंगळवेढेकर

असावा सुंदर चॉकलेटचा बंगला
चंदेरी सोनेरी चमचमता चांगला ॥धृ॥

चॉकलेटच्या बंगल्याला टॉफीचे दार
शेपटीच्या झुपक्यान झाडून जाई खार
॥१॥

गोल गोल लेमनच्या खिडल्या दोन
हॅलो हॅलो करायला छोटासा फोन
बिस्किटांच्व्हा गच्चीवर मोर छानदार
पेपरमिंटच्या अंगणात फुले लाल लाल
॥२॥

चांदीच्या झाडामागे चांदोबा राहातो
मोत्याच्या फुलातुन लपाछपी खेळतो
खेळतो छपी खेळतो
उंच उंच झोक्याला खेळ रंगला
मैनेचा पिंजरा वर टांगला
किती किती सुंदर चॉकलेटचा बंगला
चंदेरी सोनेरी चमचमता चांगला ॥३॥



# || रंगांचा सोहळा ||

अरुण वि देशपांडे - पुणे



लहान-थोर बघा आज झाले गोळा

होळीचा सण हा रंगांचा सोहळा .........||

रंग सारे किती न्यारे ,लाल- नि हिरवा

धम्मक ,पिवळा नि निळासावळा.... ||

आरडा -ओरडा करो कुणी कितीही

खुशाल टाका त्यावरती रंग निळा ......||

आनंदाने उत्साहाने सारे हो खेळा

रंगात भिजण्या नाही कुणा कंटाळा .. .|| होळी

पूजनी आपण एक करावे

जे वाईट अवघे, ते सोडोनी द्यावे......||

# पणजी आजीची गोधडी

आजी आजोबांची गोधडी म्हणजे
उलटी कि सुलटी कळत नाही
पणजी आजीची माया त्यात
फेकून द्यावीशी वाटत नाही

पणजी आजीनी हातानी
शिवली साडीची गोधडी
ती घेऊन रोज मी झोपते
लाऊन दाराला घट्ट कडी

अंगावर घेऊन गारठ्याच
झोपते आईच्या कुशीत
अभ्यास पूर्ण झाला म्हणून
आहे मी आज खुशीत

आपल्या भाषेत म्हणायचं तर गॅरंटी इतकी की
शंभर वर्ष झाली तरी जाणार नाही रंग
कितीही जुनी झाली तरी मी सोडणार नाही तिचा संग

**-तनया देवळे**

**[इयत्ता ६वी] डोंबिवली**



# फुलपाखरू

फार फार वर्षापूर्वीची गोष्ट.

त्यावेळी फुलपाखरे असत फक्त एकाच रंगाची.

म्हणजे गर्द हिरवी, निळीशार, पिवळीधमक, लालचुटूक, काळी कुळकुळीत, पांढरीशुभ्र, झगमगीत सोनेरी किंवा चकचकीत चंदेरी.

फुलपाखरांच्या पंखांवर रंगीबेरंगी ठिपकेच नसत.

किंवा वेगवेगळया रंगाच्या रेषा पण नसत.



फुलपाखरे उडायची.

फुलांवर बागडायची.

बागेत भिरभिरायची.

सगळीकडे ऊड-ऊड करायची.

पण एका जागी कधी स्थिर नसायची.

फुलांवर नाही बसायची.

पानांवर नाही बसायची.

झाडांवर नाही बसायची.

गवतावर नाही बसायची

दिवसभर ऊड-ऊड करायची.

रात्री काळोखाड लपून बसायची.



दिवसभर ऊड-ऊड करुन बिचारी फुलपाखरं दमून जायची. थकून जायची.

फुलांवर बसलं तर.....

कुणीतरी येऊन पकडणार.

पानांवर बसलं तर.....

कुणीतरी खाणार.

गवतावर बसलं तर.....

कुणीतरी येऊन मटकवणार.

झाडांवर बसलं तर....

कुणीतरी झडप घालणार.फुलपाखरांना कळेना आता करावे काय?

सगळे प्राणी पक्षी बसतात आरामात.

मग आपणच का सारखे हलवावे पाय?
हलवायचे पंख?
उडायचं भूरभूर आणि जायचं दूरदूर?
आणि आपणच का असे एकरंगी?

आपणच असे एकरंगी असल्याने, आपल्याला फुलांच्या ताटव्यात दडता येत नाही.
इवल्या इवल्या गवत फुलांत मिसळता येत नाही.
पानांमागे लपता येत नाही.
झाडांवर शांतपणे टेकता येत नाही.

आपल्याला सुध्दा हवेत रंग. काय करावे यासाठी?
किती दिवस रहायचं असं, एकरंगी एकपाठी?
फुलपाखरे सतत हाच विचार करू लागली.

आणि अचानक एकेदिवशी त्यांना रंगसाक्षात्कार झाला.

फुलपाखरे सारखी ऊड-ऊड करायची. त्यामुळे ती रंग पाहायला विसरायची.

आता फुलपाखरे रंग पाहू लागली.
रंगांच्या जवळ जाऊ लागली.
रंगांभोवती घोटाळू लागली.

आकाशाचे रंग. ढगांचे रंग.
पानांचे रंग, फुलांचे रंग.



झाडाचे रंग, वेलीचे रंग.
किडयाचे रंग. माशांचे रंग.
प्राण्याचे रंग. पक्षांचे रंग.
आकाशामल्या इंद्रधनुष्याचे रंग.

फुलपाखरे या सा-या रंगात दंग होऊ लागली.
पानांभोवती रुणझुणली.
फुलांमध्ये लपली.
झाडांवरती टेकली.
वेलीवरती विसावली.

प्राण्यांसोबत भूरभूरली.

पक्षांसोबत खेळली.

आकाशाच्या जवळ गेली.

ढगावर बसली.

आणि, इंद्रधनुष्यावरून घसरत घसरत पुन्हा इथे आली!



दुस-या दिवशी पहाटे रंगीबेरंगी दव पडलं...

फुलपाखरांच्या पंखांवर.

रंगांची बरसात झाली...

फुलपाखरांच्या पंखांवर..

रंगांचा वर्षाव झाला...

फुलपाखरांच्या पंखांवर.

पानांचे, फुलांचे, वेलींचे, प्राण्यांचे, पक्षांचे, आकाशाचे, ढगांचे आणि इंद्रधनुष्याचे सारेच रंग पसरले फुलपाखरांच्या पंखांवर!!

तेव्हापासून...

सगळी फुलपाखरे रंगीबेरंगी झाली.

उडता उडता फुलांवर बसू लागली.
फुलांमध्ये मिसळून गेली.



राजीव तांबे



# जादूचा फुगा ...

## ...रेशमी गुजराथी

एक खूप छान नाजूक परी मऊ रेशीम किरणांनी विणलेला सुंदर सोनेरी झगा घालून कपाळावर चांदणीची तिट लावून आपले मऊमऊ केस भुरूभुरू उडवत नाचत बागडत धरेवर येते, तेव्हा होत असते 'रम्य पहाट.'



तिच्या आगमनाने सारी धरा आनंदीत होते. एक नवी चेतना निर्माण होते. फुलपाखरे भुरूभुरू उडू लागतात. गार वारे परी बरोबर खेळ खेळू लागतात. झाडे, फुले आनंदाने डोलू लागातत. पक्षी आपल्या किलबिलाटाने तिचे स्वागत करतात. शेतात दूरवर पाखरांची मधुर शीळ कानी पडते. मोटेचा करकर आवाज कानी येवू लागतो. देवळात घंटानाद होऊ लागतो. सार्यांप धरेवर उत्साही वातावरण निर्माण होते.

रानावनात-पाना फुलांत रेशमी किरणांचे जाळे पसरू लागते.
धरेवर अवतरलेल्या परीच्या हातात असते 'एक दोरी.' दोरीला एक फुगा बांधलेला असतो. फुगा असतो जादूचा.

निळ्या घाटावर, लाल वाटेवर, हिरव्या डोंगरामागून आकाशात पूर्व दिशेला हा फुगा जेव्हा दिसतो तेव्हा अवघी पूर्व दिशा लाल-सोनेरी रंगांनी उजळून निघते. ती असते 'पहाट वेळ.'

हळुहळु अंधाराचे जाळे दूर होवू लागते. धरेवर कामसू सकाळ होते. माणसे आपापल्या कामाला लागतात. घरा-घरात सारी आवरा आवर सुरू होते.

काही वेळातच या फुग्याचा रंग बदलू लागतो. तो बनतो एक तापलेला गोळा, आकाशात तो मध्यावर येतो आणि धरेवरचे वातावर बदलून जाते. शांत, निवांत, सुस्त पेंगुळलेली दुपार होते.

पृथ्वीवर बागडणारी परी पश्चिमेची वाट धरते. हळुहळु फुग्याचा रंग बदलू लागतो. तो लाल-सोनेरी-केशरी होतो. रमत गमत संध्याकाळ धरेवर येवू लागते. पक्षी आपापल्या घरट्याकडे, माणसे घराकडे परतू लागतात.

सकाळी पूर्वेकडे, मध्यान्ही डोक्यावर असणारा हा जादूचा फुगा, सोन्याचा गोळा बनून पश्चिमेकडे गायब होतो.

पृथ्वीवर काळोख दाटू लागतो. भयाण शांततापसरू लागते. किर्रर रात्र होते. दिवसभर काम करून दमलेली माणसे विश्रांती घेऊ लागतात.

आभाळदेशात चांदणघाटावर चमचमाट होतो. पहाटेच्या लाल वाटा चंदेरी होतात. चंद्र-चांदण्यांने आकाश सजते.

आकाशातून धरेवर येणारी ही परी आपल्याकडील जादूच्या फुग्याच्या सहाय्ययाने धरेवर पहाट, सकाळ, दुपार, संध्याकाळ व रात्र असे दिवसाच्या वेळेचे चक्र फिरवते. पहाटे लाल-सोनेरी-केशरी रंगाचा दिसणारा, आपल्या नाजूक रेशमी किरणांनी धरेवर नाजूक जाळे विणणारा, आपले सोनेरी दूत पक्षांच्या घरट्यांशी धाडणारा, दुपारी तप्त गोळा बनणारा, दाही दिशा प्रकाशाने भरून टाकणारा, सायंकाळी परत सोनेरी गोळा बनून, पश्चिमेकडे डोंगरा आड गडप होणार हा जादूचा फुगा म्हणजे आपल्या सर्वांना प्रकाश देणारा 'सूर्य' हे ओळखले असलेच.

सौजन्य :- http://marathi.webdunia.com



## रंग आणि माणसाची भूक

### लाल रंग

हा रंग ऊर्जेचे प्रतीक आहे. श्वास घेण्याची गती हा रंग वाढवू शकतो. याच्या संपर्कात आल्याने व्यक्तीचा रक्तप्रवाह तीव्र होण्यासोबतच तिची भूकही वाढते. याच कारणामुळे अनेक रेस्टॉरंट्समध्ये भिंतींना लाल रंगच दिला जातो. तसेच घरातील डायनिंग रूम किंवा हॉलमध्येसुद्धा लाल रंगाचे इंटरियर किंवा लाल रंग ठेवण्याचा सल्ला दिला जातो.

### निळा रंग

हा रंग मेंदूसह शरीरासाठीही फायदेशीर मानला जातो. हा रंग शरीराचे मेटाबॉलिझम मंद करतो आणि भूकही कमी करतो. तज्ज्ञांच्या मते, जेव्हा एखादी व्यक्ती वजन कमी करण्याच्या उद्देशाने डाएटिंग करत असेल, तर तिने आपल्या रेफ्रिजरेटरमध्ये निळ्या रंगाचा लाइट लावावा. अशा प्रकारे त्याला भुकेवर नियंत्रण मिळवण्यात मदत होईल.

### नारिंगी रंग

हा रंग मेंदूपर्यंत होणारा आॅक्सिजनचा पुरवठा वाढवण्यात महत्त्वाची भूमिका बजावतो. याच्या संपर्कात आल्यावर व्यक्तीमध्ये तरतरीतपणा येतो. तसेच तिच्या मेंदूची कार्यप्रणालीही तीव्र होते. इंटेरियर डिझायनरच्या दृष्टीनेही हा रंग शरीर आणि मनाला

आराम देणारा असतो. तज्ज्ञांच्या मते, याच प्रकारे नारिंगी रंग भूक वाढवण्यातही सहायक आहे. नारिंगी रंगांचे फळ म्हणजेच सर्व प्रकारच्या आंबट फळांच्या सेवनानेसुद्धा भूक वाढते. यासोबतच हा रंग शरीराची प्रतिकारशक्ती वाढवण्यातही मदत करतो.

## हिरवा रंग

हा रंग निसर्गाशी निगडित आहे. यामुळे हा रंग आरोग्यासाठीही खूप फायदेशीर मानला जातो. त्यामुळेच जेवणामध्ये भरपूर प्रमाणात हिरव्या पालेभाज्यांचा समावेश करण्याचा सल्ला डॉक्टर देतात. याच कारणांमुळे दवाखान्यांमध्येही हिरव्या रंगाची भिंत आणि पडदे लावले जातात. जेणेकरून रुग्णांना लवकर बरे होण्यासाठी अनुकूल आणि शांततापूर्ण वातावरण मिळू शकेल.

## पिवळा रंग

या रंगाकडे व्यक्ती जास्त आकर्षित होते. यामुळे संपर्कात आल्यावर एकाग्रता वाढण्यासोबतच कार्यक्षमताही वाढते. तज्ज्ञांच्या मते, हा रंग भूक वाढवण्यातही मदत करतो. यामुळे स्वभावात सकारात्मक बदल पाहायला मिळतो.

## समुद्री हिरवा रंग

यामुळे जास्त भूक लागते. त्याचबरोबर जर नारिंगी रंगाचे कॉम्बिनेशन असेल तर खाद्यपदार्थ अत्यंत चविष्ट असल्याचा भास

होतो. वैद्यकीय तज्ज्ञांच्या मते, या रंगाच्या खाद्यपदार्थांचे पोस्टर्स स्वयंपाकघर किंवा डायनिंग रूममध्ये लावावेत. हे पोस्टर्स पाहूनही व्यक्तीची कमी जेवणाची सवय किंवा जेवणाबाबतची उदासीनता दूर होईल.



बालनेटाक्षरीचा हा अंक तुम्हाला कसा वाटला? एकूणच हा उपक्रम तुम्हाला आवडला का ? मग तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानबद्दल जाणून घ्यायला नक्कीच आवडेल.

२००८ मध्ये स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना पावणे दोनशेहून अधिक दर्जेदार मराठी ई पुस्तके / नियतकालिके विनामूल्य दिली आहेत. मोरया, मीरा, कृष्णा, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वा. विवेकानंद, विंदा करंदिकर, ना धों महानोर, ग्रेस , नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे चारशे नवीन साहित्यिकांना या व्यासपीठावरून सादर केले. आमचा प्रत्येक अंक, आमचे प्रत्येक पुस्तक ई मेलच्या माध्यमातून साधारणतः सव्वालाख मराठी वाचकांपर्यंत जातो. जगभरात पसरलेल्या पण मनाने महाराष्ट्रातच असणार्या प्रत्येक वाचकापर्यंत जाण्याचा आमचा प्रयत्न आहे. आम्ही इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. प्रेम आणि सौंदर्याबरोबरच विद्यार्थी आणि शेतकर्यांच्या आत्महत्या, दहशतवाद, प्रेमभंगातून येणारी निराशा अशा ज्वलंत विषयांवरचं साहित्य मांडलं. विनोदाला वाहिलेलं ई श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीताची समज तरुणांत येण्यासाठी संगीत कानसेनचे ई वर्ग चालवले. नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातल्या किल्ल्यांची माहिती देणार्या पुस्तिकांच्या "दुर्ग दुर्गट भारी" या मालिकेद्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगभरातल्या मराठी मंडळींना मराठमोळ्या इतिहासाची उभारी दिली. लवकरच आमचा ई-यत्ता हा ज्ञानवेध घेणारा उपक्रम सुरू होईल. मराठीचं वैभव जे ज्ञानदेव तुकाराम. अशा संतांच्या पुस्तिकांची एक मालिका आपल्या भॆटीला येईल. केवळ कविताच नव्हे तर कथा कादंबर्या आणि गंभीर विषयांवरची पुस्तकेही आपल्याला इथे मिळतील. तर तरुणांमध्ये नव्या जगाला सामोरं जाण्याची हिंमत जागवणारं "उनाड" लवकरच आपल्या भॆटीला येणार आहे.

esahity@gmail.com